**श्री. वाय. पी. सावंत, उप आयुक्त (व.श्रे.), राज्य उत्पादन शुल्क (गट-अ) यांना उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राउशु या पदावरील मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-२७११/प्र.क्र.२६७/राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १९ सप्टेंबर, २०१८.

वाचा:-

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि.०६.०६.२००२.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.इएसटी-२७०९/प्र.क्र.३३७/इएक्ससी-४, दि.१८.०३.२०११.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/ व्हीआयची २१०/ प्र.क्र. ४१२/ का-१२, दि.२१.०८.२०१५.

**शासन आदेश:-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील अधिकारी श्री. वाय. पी. सावंत यांना उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदावर संदर्भाधीन दि.१८.०३.२०११ च्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली आहे. तथापि, उप आयुक्त (व.श्रे.), राज्य उत्पादन शुल्क या पदाच्या सन २००६-०७ व २००७-०८ च्या निवडसूच्यांमध्ये चुकीच्या पद्धतीने आरक्षण विहीत करण्यात आल्याने, या आरक्षणाच्या आधारे दिलेल्या पदोन्नत्या देखील चुकीच्या ठरल्या आहेत. या पार्श्वभूमीवर सामान्य प्रशासन विभाग/१६-ब ने निश्चित करून दिलेल्या आरक्षणानुसार सदर पदाच्या सन २००६-०७, सन २००७-०८, सन २००८-०९, (सन २००९-१० या वर्षाची निवडसूची विभागाने तयार केली नाही) व सन २०१०-२०११ या सुधारित निवडसूच्या सामान्य प्रशासन विभागास मान्यतेस्तव सादर केल्या असता, त्यास सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेली आहे.

२. त्याअनुषंगाने, श्री. वाय. पी. सावंत यांचा सन २००७-०८ च्या उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदाच्या सुधारित निवडसूचीमध्ये समावेश करण्यात आला असल्याने, त्यांना या निवडसूचीतून सदर पदावरील पदोन्नतीचा अनुज्ञेय असलेला दि.२५.०६.२००७ हा दिनांक मानीव दिनांक म्हणून प्रदान करण्यास सामान्य प्रशासन विभागाने सहमती दर्शविली आहे.

३. सबब, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ मधील नियम ४ चा पोटनियम (२) चा खंड ब मधील परंतुक आणि सदर नियमावलीतील नियम ५ (४) मधील तरतूदींस अनुसरून, श्री. वाय. पी. सावंत यांना उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदाच्या सन २००७-०८ च्या निवडसूचीतून अनुज्ञेय असलेला पदोन्नतीचा दि.२५.०६.२००७ हा मानीव दिनांक म्हणून प्रदान करण्यात येत आहे. तसेच सदर पदावरील मानीव दिनांक हा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. या प्रकरणी आयुक्त, राउशु यांना कळविण्यात येते की, श्री. वाय. पी. सावंत यांना उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क या पदावरील मंजूर केलेला दि.२५.०६.२००७ हा मानीव दिनांक, ते त्यांनी सदर पदोन्नतीच्या पदावरील प्रत्यक्ष कारभार स्वीकारल्याचा दिनांक, या कालावधीतील त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करावी. तथापि, काल्पनिक वेतननिश्चिती केलेल्या कालावधीतील वेतन व भत्त्यांची थकबाकी, श्री. सावंत यांना अनुज्ञेय रहाणार नाही.

५. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८२६/कार्या-१२, अनौपचारिक संदर्भ क्र.१२५२/२०१७/ कार्या-१२, अनौपचारिक संदर्भ क्र.१९५/२०१८/ कार्या-१२ दि.०१.०३.२०१८ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११६/१८/सेवा-३, दि.०९.०४.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने आणि सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.२१.०८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०९१९१३३५०५४०२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.09.19 13:42:16 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) श्री. वाय. पी. सावंत, उप आयुक्त (व.श्रे.) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क.
३) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (सेवा-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती (राउशु-१)